**भारतीय खेडी आणि भारताचे भवितव्य**

*'साधना' साप्ताहिकाच्या ३१ डिसेंबर अंकात श्री. ना. ग. गोरे यांनी 'विकास आणि तारतम्य' या शीर्षकाखाली एक टिपण लिहिले आहे. केवळ 'माणूस' हा लघुत्तम घटक विचारात घेणे योग्य नाही, 'राष्ट्र' हा महत्तम घटकही महत्त्वाचा आहे. गांधींची ग्रामस्वराज्याची कल्पना विचारात घेत असता राष्ट्राची कल्पना वगळून चालणार नाही, असे मत त्यात व्यक्त केले आहे. तसे करताना खेड्यासंबंधी त्यांनी लिहिले आहे -*

*"इंग्रज येथे येण्यापूर्वीच्या भारतात खेडी बहुतांशी स्वावलंबीच नव्हती का? येथील जवळजवळ सर्व कारभार ग्रामपंचायतीच्या मार्फतच झाले. १२ बलुतेदारांच्या आधारावर उभारलेली अशी ती रचना होती. परंतु या गावगाड्याच्या पद्धतीमुळे दिल्लीला कोणाचे राज्य आहे याची फिकीर जनपदातल्या रहिवाश्यांनी कधी केली नाही, असा आक्षेप इतिहासाचार्य राजवाडे यांनी केला आहे आणि डॉ. आंबेडकर यांनी तर त्यांचे वर्णन 'परंपरांचे उकिरडे' अशा तीव्र शब्दांनी केले आहे त्यावेळी तेथे रामराज्य होते, हे खरे की खोटे?"*

*'पुरोगामी विचारवंतां'ची दृष्टी या परिच्छेदातून व्यक्त झाली आहे. या संदर्भात श्री. वसंत पळशीकर यांनी लिहिलेला हा लेख. लोकशक्तीच्या जागरणाचा अर्थ खेड्यांचे जागरण, अर्थात् समुदायांचे पुनर्निर्माण हाच आहे. स्वायत्त व समर्थ समुदायांची बांधणी लोकशक्ती जागृतीतूनच होऊ शकते आणि अशा समुदायांमध्येच लोकशक्ती प्रभावी व अधिकारसंपन्न होऊ शकते. श्री. पळशीकरांचा लेख या दृष्टीने वैचारिक स्पष्टता करण्यासाठी महत्त्वाचा ठरावा - सं.*

'वाद-संवादा'मधील त्यांच्या टीकाटिप्पणीत श्री. नानासाहेब गोरे यांनी (साधना, ३१ -१२ - १९८८) खेड्यांसंबंधी एक परिच्छेद लिहिला आहे.

**प्रचलित प्रवादांचा अडाणीपणा**

ब्रिटिशपूर्व काळातल्या खेड्यांची रचना, त्यांचा कारभार, त्यांची स्थिती यांच्यासंबंधी भल्या-भल्या सुशिक्षितांमध्ये बरेच प्रवाद आहेत. ब्रिटिशांच्या लेखनामधूनच हे प्रवाद निर्माण झाले, पसरले व सुशिक्षित भारतीयांच्या दोन-तीन पिढ्यांमध्ये दृढ झाले. इतिहासाचार्य राजवाडे जसे या प्रवादांचे शिकार होते तसे काही प्रमाणात म. गांधीही आणि थोड्याफार फरकाने आपण सर्वही. पण आज तत्कालीन वस्तुस्थितीची अधिक सम्यक ओळख करून देणारी साधने उपलब्ध आहेत. श्री. धर्मपाल यांचे ग्रंथ व लेख अठराव्या शतकाच्या अखेरीस खेड्यांची काय स्थिती होती यावर क्रांतिकारक म्हणावा इतका वेगळा प्रकाश टाकीत आहेत. याच संदर्भात आद्रेविक यांचा 'लँड अँड सॉव्हरिनटी इन इंडिया : मराठा स्वराज्य इन द एटींथ सेंचुरी' (भारतीय आवृत्ती : ओरिएंट लॉगमन, १९८६) हा ग्रंथही जरूर अभ्यासण्यासारखा आहे.

यजमान शेतकऱ्याभोवती व त्याच्या शेतीला पूरक कामे करणाऱ्या, त्याची सेवा करणाऱ्या बारा बलुतेदारांभोवती रचलेले खेडे हे मुळातच एका व्यापक नागर सभ्यतेमधील (सिव्हिलायझेशन) पायाभूत घटक म्हणून अस्तित्वात आले व राहिले असले पाहिजे ही गोष्ट थोड्या विचारांती सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट होणारी आहे. मोहंजदडो-हडाप्पा सभ्यतेच्या उदय - उत्कर्षाच्या काळापासून व्यापक नागर व्यवस्थेला पायाभूत शेतकी घटक म्हणून 'यजमानी पद्धती'चे खेडे अस्तित्वात आहे. म्हणजेच, 'बाहेरच्या जगाशी खेड्याचे राजकीय, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक-धार्मिक संबंध होते.

हे कोंदण आणि या संरचनेची प्राचीनता ध्यानात घेतली म्हणजे खेड्यांसंबंधी (आणि खेडुतांसंबंधीही) आपल्या लोकप्रिय शिथिल धारणा किती झापडबंद आहेत हे उमगते.

कमी-अधिक विस्तार असलेली 'केंद्रीय' राज्ये आणि खेडी यांचे संबंध महसुलाच्या, शिपाईगिरीच्या जमिनींवरूनच्या तंट्यांच्या संदर्भात प्राधान्येकरून येत. राज्यकर्ते बदलले की, नव्या राज्यकर्त्यांचे अधिकारग्रहण आपणास फायद्याचे आहे की तोट्याचे, फायद्याचे व्हावयाचे असेल तर कोणाशी कसे संधान बांधले पाहिजे याची अत्यंत सूक्ष्म, प्रगल्भ, वास्तववादी व बेरकी जाण खेडुत यजमान शेतकरी कुटुंबांच्या ठायी आढळून येई. ही जागरूकता, बदलाचा फायदा घेण्याची तत्परता

ध्यानात घेता राज्य कोणाचे आहे याची फिकीर नसे असे म्हणणे आपल्या अडाणीपणाचे द्योतक करते. या प्रकारचा अडाणीपणा. भारतातील उच्च शिक्षितांच्या ठायी ब्रिटिशांनी कळत-नकळत चांगलाच जोपासला.

'रामराज्य' हा शब्द म. गांधींचा आहे असे मानले तर एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. तत्कालीन खेड्यांमध्ये रामराज्य आढळत होते असे गांधींनी कधी म्हटले नाही. अस्पृश्यतेचा पापी कलंक मिरविणारी खेडी रामराज्ये बनू शकतील वा असतील असे गांधी कधीच म्हणाले नसते. दीर्घकाळपर्यंत जातिव्यवस्थेविरूद्ध गांधींचा तीव्र आक्षेप नव्हता. उच्चनीचभाव व व्यवहार हा आक्षेपार्ह भाग जरूर आहे, पण स्पर्धा टाळणारी श्रमविभागणी या व्यवस्थेत आहे म्हणून वर्णव्यवस्थेची भलावण ते करीत राहिले. कालांतराने त्यांना ही गोष्ट उमजली की, प्राचीन काळी कधीतरी श्रमविभागणीच्या जोडीला उच्चनीचभाव राहिला नसेलही, पण वर्तमानकाळी उच्चनीचभाव व अन्याय्य, शोषणाधिष्ठित व्यवहार यांची जातीपातीशी पक्की सांगड बसलेली आहे व जातपातींची सरमिसळ व्हायला हवी. म्हणून, मी यापुढे फक्त आंतरजातीय विवाहांनाच आशिर्वाद देण्यास उपस्थित राहीन असे ते म्हणाले. तेव्हा, एका अर्थी, 'परंपरांचे उकिरडे' म्हणत असताना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना जी मुख्य गोष्ट अभिप्रेत होती, तीवरून गांधी त्यांच्याशी सहमत झाले असते.

**'गावगाडा'चा अधिक्षेप नको**

पण, खेड्यांचे अनाठायी उदात्तीकरण जसे करू नये तसे ‘गावगाड्या'चा वारेमाप अधिक्षेपही करू नये. म. गांधींना टोकाचा विरोध हर एक मुद्द्यावरून करावयाचा या तत्कालीन राजकारणी वातावरणाचा व व्यवहाराचा भाग म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी खेडी नष्ट झाली पाहिजेत अशी भूमिका घेतली असेल म्हणून ती तपासून न घेता आजही पुरोगामी म्हणून उचलून धरण्याचे कारण नाही. समाजरचनेचा पायाभूत घटक (युनिट) म्हणून खेड्याचे स्थान व महत्त्व नाकारण्यामुळे व्यवहारात येथील राजकीय व आर्थिक-औद्योगिक व्यवस्था कोणत्या वळणाने जाईल याचा विचार अवश्य केला पाहिजे. आज खेडी अस्तित्वात आहेत पण त्यांना वाऱ्यावर सोडून दिलेले आहे. ती निम्मीशिम्मी उध्वस्त अवस्थेत काळ कंठित आहेत. उध्वस्तपण मानसिक, सांस्कृतिक व ऐहिक-आर्थिक, तिन्ही प्रकारचे आहे. महारांची अवस्था काय आहे? लोकशाही संस्कृतीला, संतुलित, निरोगी जीवनाला पोषक अशी त्यांची स्थिती आहे का? जगातल्या कोणत्या देशातल्या बड्या शहरांमध्ये गुन्हेगारी वाढताना आढळत नाही? परदेशातही खेडी मोडल्यामुळे नागर सभ्यता असंतुलित, बहकल्यासारख्या झाल्या आहेत. भारतात तर परिस्थिती अधिकच वाईट आहे व आणखी वाईट होणार आहे. माफिया टोळ्या, तस्कर, बिल्डर, गुंड, राजकारणी त्यांच्याशी साटेलोटे असणारे व्यापारी-उद्योगपती आणि नोकरशाही यांचे राज्य शहरांमध्ये प्रस्थापित झालेले आढळत असेल तर त्याचा संबंध खेडी उध्वस्त होऊ देण्याच्या धोरणाशी आहे हे ओळखण्याची नितांत गरज आहे.

प्रत्येक समाजाचा एक वारसा आणि परंपरा असते, म्हणजेच इतिहास असतो. या इतिहासात त्या समाजातल्या माणसांची पाळेमुळे रूजलेली असतात, मने घडलेली असतात. इतिहासाच्या ओघात त्यांच्या क्षमताही विकसित झालेल्या असतात. मुळांसकट उखडून माणसे उकिरड्यावर फेकणारे प्रचंड आघात जर आकस्मिक व दीर्घकाळ झाले, जबरीने झाले तर ती माणसे सैरभैर होतात. अशी परिस्थिती सर्वांगीण हुकूमशाहीच्या निर्मितीला एक आमंत्रण असते. हुकूमशाही प्रस्थापित होण्याआधी जे अराजक माजते त्यात गुंडागर्दीत वाकबगार माणसे समाजाची सूत्रे हाती घेतात. गेल्या चाळीस वर्षांमध्ये आपल्या डोळ्यादेखत ही प्रक्रिया घडत आहे.

दुसऱ्या बाजूला, ऐतिहासिक वारसा व परंपरा, संस्था व प्रघात यांचा अद्यापही लोकांना किती आधार आहे याचाही अनुभव येत आहे. नातीगोती, जात, धार्मिक श्रद्धा यांना क्रांतिकारक चळवळीही डावलू शकलेल्या नाहीत. तुच्छ, टाकाऊ, प्रतिगामी लेखल्या गेलेल्या वारसा आणि परंपरा, जातिसंस्था व नातीगोती, खेडीपाडी यांच्याच प्रभावामुळे या देशात हुकूमशाहीची, लष्करशाहीची वाट रोखली गेली आहे. १९७७ साली आणिबाणी उलथली गेली तिचे श्रेयही या गोष्टींना बहुधा द्यावे लागेल. अनेक अंगांनी 'चिरफाळलेला' हा समाज असल्यानेच या साऱ्या समुदायांना बरोबर घेऊन बेरजेचे राजकारण करण्याच्या अनिवार्य गरजेपोटी या देशात लोकशाही राजकारणाचीच कास अखेरीस सत्ताकांक्षी

राजकारण्यांना धरावी लागते.

एका आमूलाग्र सामाजिक-आर्थिक-राजकीय व सांस्कृतिक पुनर्रचनेची आकांक्षा बाळगून कार्य करीत असतानाही व्यापक अर्थाने इतिहास - परंपरा व संस्था, तसेच लोकांच्या ठायी असलेल्या वैशिष्ट्यपूर्ण क्षमतांचे भान म. गांधींना होते. देशाची नाडी त्यांना कळत होती आणि तेच एक देशव्यापी लढा उभारू शकत होते, या मागे ही जाण व हे सम्यक मूल्यमापन होते. खेड्यांना उद्देशून 'परंपराचे उकिरडे' असे उद्गार एखाद्या वैतागाच्या क्षणी काढणे ठीक आहे. पण, खेड्यातील जनसामान्यांनी शेकडो वर्षे गावगाडा समर्थपणे चालविला, इतक्या समर्थपणे की साम्राज्याच्या आकाराच्या बड्या राज्यांतही त्या गावगाड्याशी जुळवून घ्यावे लागले, यामधून प्रकट होणाऱ्या लोकांच्या राजकीय व व्यावहारिक क्षमतांचा अधिक्षेप करणारा निवाडा जर या उद्गाराद्वारे केला जात असेल तर ती गोष्ट कमालीची असमंजस म्हणायला हवी.

गावगाडा - ज्यात गावकीचा कारभार येतो तसा तो जातिजमातींचा अंतर्गत कारभारही येतो - केवळ उच्चवर्णीय चालवीत नव्हते. तळागाळातल्या व अस्पृश्य गणल्या गेलेल्या जातिजमातींमध्येही अनेकानेक माणसांचा गावगाडा चालविण्यात हातभार असे हेही विसरून चालणार नाही.

### खेडे : पायाभूत घटक

भारतीय भावी नागरसंस्कृती लोकशाही समाजवादी वळणाची व आशयाची घडावयास हवी असेल तर खेडी ही पायाभूत घटक म्हणून जोपासायला हवीत. शहरे अस्ताव्यस्त वाढणार नाहीत याची खबरदारी घ्यावी लागेल. शहरांमध्येही खेड्यांच्या धर्तीवर रचना करावी लागेल. सहभागी लोकशाही तेव्हाच मूर्त स्वरूपात अवतरेल.

खेडे हा समाज-संरचनेचा पायाभूत घटक असावा असे म्हटले की, कारण नसतानाच, असे गृहीत धरले जाते की जातपात व अस्पृश्यता टिकवून धरण्यासाठीच खेड्यांचा पक्ष उचलून धरला जात आहे. नव्या भारतात खेडी ही जर पायाभूत घटक बनवावयाची असतील तर त्याच्या तीन पूर्वशर्ती असतील :

(१) उत्पादनसाधनविहीन पूर्वास्पृश्य, भटक्या व अन्य तळागाळातल्या जातिजमातींच्या हाती पर्याप्त प्रमाणात उत्पादनसाधनांचे (ग्रामीण भागात मुख्यतः जमिनीचे) वाटप. समान परिस्थितीत सर्व समाजविभागांना आणून ठेवण्याच्या दृष्टीने हे आवश्यक आहे. या फेरवाटपात सवर्ण समाजातील भूमिहीन व बलुतेदार कुटुंबांचा प्रसंगी समावेश असेल.

(२) गावाचा कारभार चालविणाऱ्या ग्रामसभेमध्ये प्रत्येक कुटुंबातील प्रौढ स्त्री-पुरुषास समानत्वाने भाग घेता येईल अशी औपचारिक कायदेशीर तरतूद हवी.

(३) गावात वेगवेगळ्या जातिजमाती राहण्यास हरकत नाही. पण अस्पृश्यतेचे, सामाजिक-धार्मिक कारणांवरून छळ, बहिष्कार, पंक्तिप्रपंच यांचे सार्वजनिक जीवनातून उच्चाटन व्हावे लागेल.

या गोष्टींसाठी योग्य कायदे करावे लागतील व दंडसत्ता त्या कायद्यांच्या मागे उभी करावी लागेल. पण कायद्यांचे पालन केवळ दंडसत्तेच्या आधारे होऊ शकत नाही. दंडसत्तेच्या पाठीशी बहुसंख्यांची संमती आणि नेतृत्वाचा नैतिक अधिकार या गोष्टी असाव्या लागतात. या दोन आवश्यकतांची पूर्तता करण्यासाठी कोणत्या प्रकारची चळवळ - वैचारिक व रचनात्मक - चालविण्याची गरज आहे यावर लोकशाही समाजवाद्यांनी ध्यान देण्याची निकड आहे.

### भविष्यातले गाव

महात्मा गांधींनी इतकी कडवी व आग्रहाची भूमिका घेतली असती का? दुसऱ्या गोलमेज परिषदेमधील (१९३१) त्यांची दोन वक्तव्ये अत्यंत सुस्पष्ट आहेत. स्वतंत्र भारताच्या शासनाकडून त्यांनी ठाम व कठोर कृतीची अपेक्षा व्यक्त केलेली आहे. अन्यत्र एका लेखात १९३१ साली त्यांनी असे म्हटले आहे की अस्पृश्यतेचा कलंक धुऊन काढला नसतानाच जर सत्ता हाती आली तर, सत्तेची भर पडल्याने आजच्यापेक्षा त्या प्रकारच्या स्वतंत्र भारतात अस्पृश्यांची स्थिती जास्त वाईट बनेल अशा निष्कर्षाला मी पोचलो आहे. तेव्हा, खेड्यांचे पुनरुत्थान केल्याशिवाय स्वराज्य वा रामराज्य या देशात अवतरणार नाही असे

गांधी म्हणत तेव्हा त्यांना जातपातीबरोबर चालत आलेली उच्चनीचता, अस्पृश्यता, विषमता, शोषण व अन्याय-अत्याचार यांना अभय द्यावयाचे होते असे कोणी मानत असेल तर त्याला एकतर अज्ञान कारणीभूत आहे किवा पूर्वग्रहदूषित मानस.

उद्याच्या खेड्यामध्ये यजमान व त्याचे आश्रित - बलुतेदार वा सेवक/चाकर अशी रचना असणार नाही. गावातील सर्वच कुटुंबांजवळ कसणुकीसाठी जमीन असेल ही शर्त घालता येईल. जुन्या काळात, आपण बसवीत असलेल्या नव्या गावी बलुतेदारांनी येऊन वस्ती करावी यासाठी त्यांनाही वतनी जमिनी देण्याची प्रथा होतीच. अस्पृश्य असूनही व गाव-नोकर असूनही महारांना गावोगाव वतनी जमिनी म्हणूनच तर होत्या. तेव्हा ही शर्त स्वीकृत होणे अवघड जाऊ नये. जमिनीवरील मालकी हक्काविषयीही पाश्चिमात्य देशांमधील अलीकडील काळातील सार्वभौम खाजगी मालमत्तेची संकल्पना आपल्याकडे नव्हती. 'सबै भूमि गोपाल की', पण उदरनिर्वाहासाठी वहिवाटीच्या बोलीवर मर्यादित काळासाठी जमिनीचे वाटप ही गोष्टदेखील शक्यतेच्या कोटीतली आहे. ग्रामदान करण्याच्या आवाहनाला मिळालेल्या एकेकाळच्या प्रतिसादावरून स्पष्ट होते की, ही भाषा लोकांना समजते. त्यांच्या अंत:करणाला व बुद्धीला ती भिडते. उद्याच्या खेड्यात सर्वांकडे कसणुकीसाठी जमीन असेल तसा जोडीला उद्योगही असेल. शेती व उद्योग यांचे संतुलन साधणे महत्त्वाचे राहील. या प्रकारच्या संतुलित रचनेलाही परंपरेत आधार आहे. अशा रीतीने परंपरांचा पूर्णत: अहेर न करता, त्यांच्याशी सांधा जुळवून घेत, त्याचवेळी काही संस्था, चालीरीती, मूल्ये नाकारीत, खेड्यांची नव्याने बांधणी करणे हे व्यवहार्य धोरण आहे, ही गोष्ट लक्षात येईल. खेड्यांचा आज उकिरडा झालाय अशी परखड टीका गांधींनीही केली आहे. पण, त्याचवेळी शेती व उद्योग यांनी गजबजलेल्या, स्वच्छ, स्वास्थ्यपूर्ण खेड्यांची उभारणी करण्याचे आव्हान स्वीकारण्याची गरज त्यांनी प्रतिपादिली.

**गावपातळीवरील क्षमता**

जुन्या काळातली खेडी आज आपण शिरोधार्य मानलेल्या मूल्यांच्या व ध्येयांच्या संदर्भात आदर्श ठरणार नाहीत ही उघडच गोष्ट आहे. पण तत्कालीन चौकटीत व संदर्भात, खेडी व बाजारपेठांची मोठी गावे यांची जी रचना अस्तित्वात होती तीमध्ये भावी भारताच्या नवरचनेला पोषक व सहाय्यक ठरतील अशा अनेक गोष्टी होत्या. उच्चनीचता, विषमता, स्वार्थी हितसंबंधाची चुरस, भाऊबंदकी इत्यादींचे अस्तित्व असूनही गावाचा एकात्म दृष्टीने ('गावकी' म्हणून) विचार करण्याची वृत्ती व परंपरा अद्यापही टिकून आहे. गावाचा विचार करावयास, गावाच्या उत्कर्षाची योजना बनवावयास बसल्यावर अधिक उन्नत अशी भूमिका घेण्यास माणसांना जड जात नाही. (संतांची शिकवण येथे फार मोलाची ठरत असणार.) अशी उन्नत भूमिका घेऊन ती राबविणारे नैतिक अधिकारसंपन्न नेतृत्व लाभले म्हणजे स्वायत्तपणे हुशारीने कारभार करण्याइतके राजकीय कौशल्य, प्रौढत्व व कर्तृत्व गावपातळीवरील माणसे अगदी सहज, हातचा मळ असल्याप्रमाणे प्रकट करतात. बाहेरच्या, उच्चतर पातळ्यांवरील केंद्रीय सत्तेच्या मागण्यांपुढे व दबावापुढे किमान तेवढे झुकत असतानाच त्या सत्तेला निष्प्रभ करून स्वतःची विकेंद्रित स्वायत्तता राखण्याचे विलक्षण राजकीय कौशल्य व जाण गावपातळीवर आढळते. ही जाण, हे कौशल्य, हा बेरकीपणा, हे कर्तृत्व अस्पृश्य गणल्या गेलेल्या, भटक्या, आदिवासी जातिजमातींच्या धुरीणांमध्येही आढळते. त्यांनी जातपंचायतींचे, जमातपंचायतींचे काम शेकडो, हजारो वर्षे चालविले आहे. कूपमंडूक वृत्तीने सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांच्यासाठी आज या क्षमता कामी लागत आहेत हा काळाचा 'महिमा' आहे. पण म्हणून या क्षमतांचा धिक्कार करून त्यांचे अवमूल्यन करणे चुकीचे होईल. 'परंपरांच्या उकिरड्यां'वरील (उकिरडे फुंकणारी?) नेतेमंडळी म्हणून या माणसांचा 'अनादर' करणे अडाणीपणाचे, कोतेपणाचे लक्षण ठरेल. भारतीय'लोकशाही लोकांनी, लोकांसाठी चालविलेली लोकांची शाही समर्थ व जिवंत स्वरुपात मूर्त करण्यात या परंपरांवर पोसलेली, या परंपरामध्ये पाळेमुळे असलेली ही माणसे फार मोलाची कामगिरी बजावू शकतात. किंबहुना, यांच्या परंपरांचा आदर करून, त्यांची मौलिकता व सामर्थ्य ओळखून, या माणसांना मदतीला घेतले व त्यांना त्यांचे कर्तृत्व प्रकट करता येईल अशी खेडीप्रधान संरचना नव्याने केली तरचे भारतीय लोकशाहीला उज्ज्वल भवितव्य आहे.

**परिशिष्ट**

महात्मा गांधींच्या लेखनातील उतारे

(१) "हा कलंक पुसून टाकण्याची हिंदूची तयारी नसेल तर आपण स्वराज्यासाठी योग्य आहोत असे त्यांना समजता येणार नाही. हे अगदी स्वयंसिद्ध तत्त्व आहे असे माझ्या ध्यानात आले आहे. अस्पृश्यतेचा कलंक मिटवून टाकल्याशिवाय जर आपल्याला सत्ता मिळाली, तर त्या 'स्वराज्या'त अस्पृश्यांची स्थिती अधिक वाईट राहील यात मला शंका नाही, कारण आपला कमकुवतपणा व उणीवा यांना मग सत्तेचा आधार मिळेल."

(यंग इंडिया, ६-८-१९३१, द रिमूव्हल ऑफ अनटचेबिलिटी मो. क. गांधी, नवजीवन पब्लिशिंग हाऊस, अहमदाबाद, १९५९, पृ. १२)

(२) "कायद्याहून कित्येकदा अधिक प्रबळ असलेल्या रूढीने त्यांना इतके अवनत केले आहे की प्रत्येक विचारशील हिंदूला याची लाज वाटली पाहिजे आणि त्याने याचे प्रायश्चित केले पाहिजे. तथाकथित उच्चवर्गीयांनी या माझ्या देशबांधवांचा जो नानाप्रकारे छळ चालवला आहे, त्याची गुन्ह्यांमध्ये गणना करण्यासाठी अत्यंत कठोर कायदे असावेत अशी माझी भूमिका आहे."

('द नेशन्स व्हॉइस' - २ या गोलमेज परिषदेसमोरील गांधीजींची वक्तव्ये व इतर वार्तापत्रे यांचा संग्रह - संपादन: चक्रवर्ती राजगोपालाचारी व जे. सी. कुमारप्पा, नवजीवन, अहमदाबाद, १९५८, पृ. ३०)

(३) "भांडवलदार, जमीनदार, तथाकथित उच्चवर्गीय त्यानंतर अधिक शास्त्रशुद्धपणे ब्रिटिश सत्ताधाऱ्यांनी केलेल्या शोषणामुळे खोल गर्तेत रुतलेल्या दलित-पीडितांना वर उठवण्यासाठी कायदे करण्यात भारताला अनेक वर्षे गुंतावे लागेल अशी मला शंका आहे. या लोकांना गर्तेतून वर काढायचे असेल तर त्यांना सतत विशेष अवसर देणे व ज्या बोज्याखाली ते चिरडले जात आहेत, त्यापासून त्यांची मुक्तता करणे हे भारताच्या राष्ट्रीय सरकारचे, आपली अंतर्गत स्थिती सुधारण्याच्या दृष्टीने परमकर्तव्य ठरते. आपल्या विरुद्ध भेदभाव केला जात आहे असे जर मग जमीनदार, श्रीमंत, विशेष सुविधाप्राप्त लोकांच्या लक्षांत आले तर मी त्यांच्याबद्दल सहानुभूती बाळगेन, मात्र त्यांना मदत करू शकणार नाही, जरी मला मदत करता आली तरीही. कारण या प्रक्रियेत मी त्यांची मदतच मागेन. अशा मदतीशिवाय दलित-पीडितांना गर्तेतून वर काढता येणार नाही." (कित्ता, पृ. ५२)

(४) "त्यांच्यापाशी जमीन नाही, तथाकथित उच्च जातींच्या दयेवरच त्यांचे जीवन अवलंबून आहे आणि खरे सांगायचे तर राज्यसत्तेच्या दयेवरही त्यांना इतरांच्या पातळीला आणण्याच्या दृष्टीने मुक्तपणे मदत करणे हे म्हणून कायदेमंडळांचे पहिले काम असेल."

- अर्थात् ही आहेरे व नाहीरेंमधील लढाई असेल आणि हीच जर भीती असेल, जर या मूक दलितांच्या डोक्याला पिस्तूल लावून अन्य वर्ग म्हणू लागले की 'आमची सत्ता व आमचे अधिकार यांची हमी घेतल्याशिवाय आम्ही तुम्हाला तुमचे सरकार मिळू देणार नाही,' तर राष्ट्रीय सरकार अस्तित्वातच येणार नाही असे मला भय वाटते." (कित्ता, पृ. ५२)

*अ-७, प्राध्यापक निवास, बोरावके महाविद्यालय श्रीरामपूर, जि. अहमदनग*